**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा वरवणे, ता.पेण, जि.रायगड येथील इमारत दुरुस्तीच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग,

शासन निर्णय क्रमांक : शाआदु-२०१०/प्र.क्र.२७०/का.१३

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ६ जानेवारी, २०११.

**वाचा:-** प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,पेण यांचे जा.क्र.शाआ-२०१०/प्र.क्र.१००४/का.१(४)/२१६४, दि.४ मे २०१० चे पत्र

**प्रस्तावना :** प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,पेण यांनी संदर्भाधीन दि. ४/५/२०१० च्या पत्रान्वये त्यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, वरवणे, ता.पेण, जि.रायगड येथील इमारत दुरुस्तीचे एकुण रु.२९,६४,५४६/- इतक्या रकमेची ६ अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केली आहेत.

सदर अंदाजपत्रके संबंधित शाखा अभियंता यांनी तयार केली असून उप विभागीय अभियंता, सा.बां.उपविभाग, पेण यांनी तपासली आहेत. तसेच प्राथमिक मुख्याध्यापक, शासकीय आश्रमशाळा वरवणे, ता.पेण, जि.रायगड, उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, पेण व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अलिबाग यांनी साक्षांकित केली आहेत.सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित असून वरील अंदाजपत्रकांमध्ये ४% सेंटेज चार्ज व २% कॉन्टीजन्सी चार्जचा समावेश करण्यात आला असून अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :** प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, वरवणे, ता.पेण,जि.रायगड येथील इमारत दुरुस्तीच्या ६ अंदाजपत्रकांना ४% सेंटेज चार्जेस वगळुन पुढीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | शासकीय आश्रमशाळेचे नांव | कामाचा तपशील | अदाजपत्रकीय रक्कम |
|---|---|---|---|
| १ | शासकीय माध्यमिक आश्रमशाळा, वरवणे, ता.पेण, जि.रायगड. | **हेटवणे प्रकल्पातील वर्ग-३ च्या निवासस्थानांचे रुपांतर वर्गखोल्यात करण्यासाठी दुरुस्ती करणे** | रु.३,३९,६४८/- |
| २ | | **हेटवणे प्रकल्पातील वर्ग-३ कर्मचारी १०-अ निवासस्थाने दुरुस्त करणे** | रु.४,९७,८०५/- |
| ३ | | **हेटवणे प्रकल्पातील वर्ग-३ कर्मचारी १०-ब निवासस्थाने दुरुस्त करणे** | रु.४,९७,८०५/- |
| ४ | | **वर्ग-३ कर्मचारी १२-अ निवासस्थाने दुरुस्त करणे** | रु.४,९७,८०५/- |

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | | **वर्ग-४ कर्मचारी १२-ब निवासस्थाने दुरुस्त करणे** | रु.४,९७,८०५/- |
| ६ | | **सामाजिक सभागृहाची दुरुस्ती करणे.** | रु.३,९८,८८५/- |
| | | **एकूण** | **रु.२७,२९,७५३/-** |

**२.** मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करुन त्याची सी.डी.शासनास सादर करण्यात यावी.

**३.** सदर दुरुस्तीचा खर्च सन २०१०-११ या वर्षात उपलब्ध असलेल्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

**४.** शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.३ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०११०१०६१५२१२६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(कैलास द.भंडलकर)
उप सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.( सोबत मुळ अंदाजपत्रक )
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी,रायगड.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अलिबाग.
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, पेण.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.